Swachhata Green Leaf Rating
**अंमलबजावणीकरीता समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीसी -२०२४/०४/प्र.क्र.१०२/पर्यटन-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २७/०६/२०२४.

**संदर्भ :** राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, नवी मुंबई यांचे पत्र क्र. समुशा ०१२४/प्र.क्र.७२/२०२४/८९५, दि. १०/०४/२०२४

**प्रस्तावना :-**

स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) टप्पा-२ अंतर्गत मार्च २०२५ पर्यंत हागणदारीमुक्त गावे घोषित करण्यासोबतच गावातील खाजगी आस्थापनेतील हॉटेल, लॉज, धर्मशाळा व होम स्टे इत्यादी ठिकाणी स्वच्छतेच्या सुविधा असणे व त्याचा योग्य वापर होणे आवश्यक आहे. त्याकरीता सदर आस्थापनांना प्रोत्साहन देण्याकरीता पेयजल आणि स्वच्छता विभाग, नवी दिल्ली आणि पर्यावरण विभाग, नवी दिल्ली यांनी “स्वच्छता ग्रीन लीफ” या संकल्पनेची सुरुवात केली असून त्याबाबतच्या मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या असून त्याबाबत कार्यवाही करण्याकरीता राज्यांना सुचना देण्यात आल्या आहे. स्वच्छता ग्रीन लीफ या संकल्पनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठीच्या राज्यस्तरावर मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“स्वच्छता ग्रीन लीफ” या संकल्पनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठीच्या मार्गदर्शक सुचनेस अनुसरून राज्यस्तरावर मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे राज्यस्तरीय समिती स्थापन करण्यात येत आहे :-

| अ.क्र | पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | मा. मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३. | सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४. | संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ५. | व्यवस्थापकीय संचालक, म.प.वि.म. | सदस्य |
| ६. | व्यवस्थापकीय संचालक, स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) | सदस्य |
| ७. | अध्यक्ष, फेडरेशन ऑफ हॉटेल ॲड रेस्टॉरंट असोशिएशन ऑफ इंडिया/ महाराष्ट्र | सदस्य |
| ८. | अध्यक्ष, हॉटेल असोशिएशन ऑफ इंडिया/ महाराष्ट्र | सदस्य |
| ९. | अध्यक्ष, इंडियन हेरीटेज हॉटेल असोशिएशन/ महाराष्ट्र | सदस्य |
| १० | अध्यक्ष, ट्रॅव्हल एजंट असोशिएशन ऑफ इंडिया/ महाराष्ट्र | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ११ | इंडियन / महाराष्ट्र असोशिएशन ऑफ टूर ऑपरेटर्स | सदस्य |
| १२ | पर्यटन क्षेत्रातील विशेष निमंत्रित सदस्य | सदस्य |
| १३ | प्रादेशिक संचालक, पर्यटन मंत्रालय, नवी दिल्ली | सदस्य सचिव |

०२ उपरोक्त नमूद समितीकडून विशेष निमंत्रित सदस्यांना तात्पुरत्या किंवा कायमस्वरूपी स्वरुपात समितीच्या आवश्यकतेनुसार बैठकीस उपस्थित राहण्याबाबत आमंत्रित करता येईल.

०३ जिल्हास्तरीय समितीची पाणीपुरवठा व स्वच्छता विभागामार्फत स्थापना करण्यात आली असून सदर जिल्हास्तरीय समित्यांच्या कामांचे पुनरावलोकन करणे आणि पुढील नियोजित कामांकरीता सल्ला देणेबाबत उपरोक्त प्रमाणे स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची प्रत्येक तीन महिन्यातून एकदा बैठक आयोजित करण्यात येईल.

०४ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२७१००८१९७४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SANTOSH VITHAL ROKADE

Digitally signed by SANTOSH VITHAL ROKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=ECF4A9ABE84C70DE989C3669424C12B6CADCB583D500FE489CE8727916E0BBEE, cn=SANTOSH VITHAL ROKADE
Date: 2024.06.27 16:06:06 +05'30'

**( संतोष वि. रोकडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
९. सर्व जिल्हाधिकारी (मार्फत पर्यटन संचालनालय, मुंबई.).
१०. सर्व सदस्य (मार्फत पर्यटन संचालनालय, मुंबई.).
११. निवडनस्ती, कार्यासन-पर्यटन-४.

****